**राज्यातील सर्व माध्यमांच्या व सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये "राज्यगीत" वाजविले/गायले जाणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: संकिर्ण-२०२४/प्र.क्र.१२७/एस.डी.-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :-१५ मार्च,२०२४.

**संदर्भ**:-सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-१४२३/प्र.क्र.१२/कार्या-३१ (राजशिष्टाचार), दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२३

**प्रस्तावना:-**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव"चे औचित्य साधून राज्यातील तरुणाई तसेच समाजातील सर्वच नागरीकांना स्फुर्तीदायक असणारे तसेच महाराष्ट्राच्या शौर्याचे वर्णन करणारे अस्मितादर्शक श्री. राजा निळकंठ बढे लिखित व शाहिर साबळे यांनी गायलेले "जय जय महाराष्ट्र माझा, गर्जा महाराष्ट्र माझा"हे गीत राज्यगीत म्हणून वरील संदर्भीय शासन निर्णयान्वये स्विकृत करण्यात आलेले आहे. सदर राज्यगीत हे अत्यंत आशयपूर्ण, स्फुर्तीदायक आणि राज्याच्या थोर आणि शूर परंपरांची गाथा सांगणारे आहे. सदर राज्यगीत राज्यातील सर्व माध्यमांच्या व सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये दैनिक सत्र सुरू होण्यापुर्वी, राष्ट्रगीत/परिपाठ/प्रार्थना/ प्रतिज्ञा यासोबत वाजविले/गायले जाईल यानुषंगाने सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या वरील संदर्भीय शासन निर्णयान्वये राज्यगीत गायन/वादन या संदर्भातील औचित्याचे पालन करण्यासाठी मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. सदर सूचनांमधील सूचना क्रमांक ४ मध्ये राज्यातील शाळांमध्ये दैनिक सत्र सुरू होण्यापुर्वी, राष्ट्रगीत/परिपाठ/प्रार्थना/ प्रतिज्ञा यासोबत राज्यगीत वाजविले/गायले जाईल,अशी सूचना करण्यात आलेली आहे. यास अनुसरून वरील संदर्भीय शासन निर्णयान्वये स्विकृत केलेले राज्यगीत राज्यातील सर्व माध्यमांच्या व सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये दैनिक सत्र सुरू होण्यापुर्वी, राष्ट्रगीत/परिपाठ/प्रार्थना/प्रतिज्ञा यासोबत वाजविले/गायले जाईल, यानुषंगाने खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

१. सामान्य प्रशासन विभागाच्या वरील संदर्भीय दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयान्वये स्विकृत केलेले राज्यगीत राज्यातील सर्व माध्यमांच्या व सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये दैनिक सत्र सुरू होण्यापुर्वी, राष्ट्रगीत/परिपाठ/प्रार्थना/प्रतिज्ञा यासोबत वाजविले/गायले जाईल.

२. राज्यातील सर्व माध्यमांच्या व सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये दैनिक सत्र सुरू होण्यापुर्वी, राष्ट्रगीत/परिपाठ/प्रार्थना/प्रतिज्ञा यासोबत राज्यगीत वाजविले/गायले जाईल याची दक्षता शाळा व्यवस्थापनाने घ्यावी.

३. वरील सुचनांचे पालन राज्यातील सर्व शाळा व्यवस्थापन करतील याबाबतची दक्षता सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक यांनी घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०३१५२१२१३५५२२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.15 21:31:45 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२.मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३.मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४.मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
५.मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र, मुंबई,
६.मा. सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र, मुंबई,
७.मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी, मंत्रालय, मुंबई-३२,
८.प्रधान सचिव (शालेय शिक्षण)शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
९.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र, पुणे,
१०.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई,
११.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे,
१२.शिक्षण संचालक (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३.शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१५.निवड नस्ती.